जिल्हा परिषद सेवेत अनुकंपा तत्वावर
नियुक्ती देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक- नोटीस-२००९/प्र.क्र.१५५/आस्था-९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- ६ जुलै,२०१०

वाचा: (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा/१०९३/२३३५/प्र.क्र.९०/ ९३६/आठ, दिनांक २६ ऑक्टोबर,१९९४

(२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक- अकंपा-१०९९/७६६/ सीआर-२५७२/१५, दिनांक २१ जून,२०००

(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही-१०९१/१६४४/प्र.क्र.२/ ९९/बारा, दिनांक २ जुलै,२००२

(४)शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक- अकंपा-३१०२/प्र.क्र.२९३/ आस्था-९, दिनांक ३ सप्टेंबर,२००३

(५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा-१००४/प्र.क्र.५१/२००४/आठ दिनांक २२ ऑगष्ट,२००५.

**शासन निर्णय:**

शासकीय कर्मचारी सेवेत असतांना दिवंगत झाल्यास किंवा गंभीर आजारामुळे/अपघातामुळे शासकीय सेवा करण्यास वैद्यकीयदृष्टया कायमचे असमर्थ ठरुन रुग्णता निवृत्त झाल्यास त्यांच्या कुटुंबावर ओढवणा-या आपत्तीत कुटुंबियांना त्वरीत सहाय्य व्हावे हया उद्देशाने प्रथम १९७६ मध्ये अनुकंपा नियुक्तीची योजना सुरु करण्यात आली. या योजनेचा वेळोवेळी आढावा घेण्यात येवून योजनेत सुधारणा करण्यात आल्या. त्यानुसार संदर्भ क्रमांक-५ येथील दिनांक २२ ऑगष्ट,२००५ च्या शासन निर्णयान्वये अनुकंपा नियुक्तीची सुधारित योजना अंमलात आली. तसेच उपरोक्त संदर्भ क्रमांक-३ येथील शासन निर्णयानुसार शासन सेवेतील निरनिराळया वेतनश्रेणीतील पदांचे गट- अ, गट-ब, गट-क, गट-ड असे वर्गीकरण करण्यात आले. सदर शासन निर्णयान्वये वेतनश्रेणीनुसार गट 'क' व 'ड' या वर्गवारीत मोडणा-या दिवंगत कर्मचा-यांच्या पात्र कुटुंबियांनाच उपरोक्त संदर्भ क्रमांक-५ येथील शासन निर्णयान्वये सरळसेवेने भरावयाच्या गट 'क' व 'ड' मधील पदांवर अनुकंपा नियुक्ती अनुज्ञेय ठरविण्यात आली आहे.

३. सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक ३ व ५ येथील शासन निर्णयाच्या परिणामी या विभागाचे संदर्भ क्रमांक २ व ४ येथील शासन आदेश ~~[illegible]~~ निष्प्रभावित करण्याचा निर्णय घेण्यात आला असून अनुकंपा नियुक्ती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदी जशाच्या तशा योग्य त्या फेरफारासह जिल्हा परिषदांना लागू राहतील असे स्पष्ट करण्यात येत आहे.

४. हे शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००७०६१४५७२६००१ असा आहे.

५. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्रकाश हिर्लेकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
६) सामान्य प्रशासन विभाग (का.क्र. आठ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७) सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
८) निवड नस्ती, का.क्र.आस्था-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.